**जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय पुनरुत्थान अभियानातंर्गत (IHSDP) योजना राबविण्यासाठी परतूर जि.जालना नगरपरिषदेस निधी उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: जनेयो.२०१६/प्र.क्र.१११/गृनिधो-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०१७.

**वाचा -**

१) अवर सचिव, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे क्र.F.No.G-20011/1/2016-BSUP/JN(Part) (FTS 12738) दि.२४ ऑगस्ट,२०१६ चे पत्र.

२) शासन निर्णय क्रमांकः पुनर्वि.२०१७/प्र.क्र.१४/अर्थ-१ दि.३० मार्च,२०१७.

**प्रस्तावना -**

केंद्रीय गृहनिर्माण व शहरी दारिद्रय निर्मुलन मंत्रालयाच्या संदर्भाधीन (१) च्या पत्रान्वये जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय पुनरुत्थान अभियानातंर्गत एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (IHSDP) योजना राबविण्यासाठी परतूर नगरपरिषद जि.जालना यांनी सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याकरिता केलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीपोटी रु.१८.७४ लक्ष इतका निधी गृहनिर्माण व शहरी गरिबी निर्मुलन मंत्रालयाव्दारे राज्य शासनास वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. केंद्र शासन पुरस्कृत आयएचएसडीपी योजनेचा मुळ कालावधी सन २००५ ते सन २०१२ पर्यंत होता. तद्नंतर या कार्यक्रमातील मंजूर घरकुले पूर्ण करण्यासाठी केंद्र शासनाने दि.१२ मे,२०१५ च्या पत्रान्वये सदरहू योजनेस दि.३१ मार्च,२०१७ पर्यंत मुदतवाढ दिली आहे. त्यामुळे सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात या योजनेअंतर्गत केंद्र हिश्श्याची तरतूद करण्यात आलेली नाही.सबब, सदर निधी परतूर नगरपरिषदेस वितरीत करण्यासाठी रु.१००० ची लाक्षणिक पुरवणी मागणी सन २०१६ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर करण्यात आली असून, क्यु-३,२२१६, गृहनिर्माण,८०,सर्वसाधारण,१०३,गृहनिर्माण मंडळे, इत्यादिंना सहाय्य, (०८) सर्वासाठी गृहनिर्माण (०८)(०१) सर्वासाठी गृहनिर्माण अंमलबजावणी यंत्रणाना अनुदाने प्रधानमंत्री आवास योजना (२२१६ २९९६), ३१ सहायक अनुदाने (वेतनत्तर) या लेखाशीर्षाखाली बचतीतून पुनर्विनियोजनाने रु.१८.७४ लक्ष (रु.अठरा लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतका निधी संदर्भाधीन (२) च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करण्यात आला. त्याअनुषंगाने परतूर,जि.जालना या नगरपरिषदेस रु.१८.७४ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

केंद्रीय गृहनिर्माण व शहरी दारिद्रय निर्मुलन मंत्रालयाकडून जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय पुनरुत्थान अभियानातंर्गत एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (IHSDP) सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी केलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीपोटी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला रु.१८.७४ लक्ष निधी परतूर नगरपरिषद, जि.जालना यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून

वितरीत करण्यास सुकाणू अभिकरणास (म्हाडा) यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणाने प्रत्यक्ष अनुज्ञेयतेची खात्री करावी.

२. सदर निधीच्या उपयोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणास सादर करण्याची दक्षता परतूर जिल्हा जालना या नगरपरिषदेने घ्यावी.

सदर निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने आणि अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत करण्यात यावा.

३. सदर निधी वित्त विभागाच्या दि.२०.४.२०१६ च्या परिपत्रकातील परिच्छेद -१८ मधील सूचनांनुसार राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाला असल्याचे कार्यासन अर्थोपाय यांनी त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३४८/अर्थोपाय दि.२४.१०.२०१६ अन्वये कळविले आहे.

४. या प्रयोजनावर होणारा खर्च क्यू-३ , २२१६ गृहनिर्माण ८०, सर्वसाधारण १०३, गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य, (०५) (०२) जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी अभियान गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम सर्वसाधारण योजना (केंद्र हिस्सा) (२२१६ १४६१) (योजनांतर्गत) (दत्तमत), ३१ सहायक अनुदाने, (वेतनत्तर) या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थस.२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२०एप्रिल,२०१६ मधील परिच्छेद क्र.६ व १८ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०४/व्यय-३ दि.१५.३.२०१७ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

तसेच सदर रक्कम यापूर्वीच्या खर्चाची प्रतिपूर्ती असल्यामुळे स्वतंत्रपणे प्रमाणित करण्याची आवश्यकता नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११८५७१८८५०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarjerao Shankar Jagdale

Digitally signed by Sarjerao Shankar Jagdale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sarjerao Shankar Jagdale
Date: 2017.03.31 19:00:11 +05'30'

**( स.शं.जगदाळे )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, (पत्राने)

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.३२.

३. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२(लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११.कोषागार अधिकारी, जालना.
१२.उप सचिव, वित्त विभाग (व्यय -३/अर्थ-१७) मंत्रालय, मुंबई-३२.
१३.उप सचिव, नियोजन विभाग(कार्यासन १४७२) मंत्रालय, मुंबई-३२.
१४.अवर सचिव, भारत सरकार, आवास व शहरी गरिबी उपशमन मंत्रालय, निर्माण भवन, नवी दिल्ली-११० ०११.(नोंदणीकृत डाकेने)
१५.सहसंचालक, लेखा व कोषागरे, कॉम्पुटर सेल, नवीन प्रशासन भवन , ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
१६.मुख्याधिकारी, परतूर नगरपरिषद, जि.जालना.
१७.निवडनस्ती, गृहनिर्माण विभाग(गृनिधो-२).